

अंक ५० - १४ नोव्हेंबर २०२२

# पुस्तक



# खिडकी

## बालदिन विशेष - मुलांनी केलेला मुलांचा अंक!!

चित्र - विहान साळस्कर,
प्रक्रिया को-लर्निंग स्पेस

पुस्तक खिडकी नावनोंदणीसाठी क्लिक करा - https://forms.gle/VaK2WdZYavvPA3jY8



# आजच्या अंकाबद्दल

आज बालदिन! मुलांसाठी खास दिवस! पुस्तक खिडकीच्या पन्नासाव्या अंकाची तारीख आणि बालदिन साधारण बरोबरच येणार हे आमच्या लक्षात आलं आणि हा अंक मुलांसाठी खास कसा करता येईल याचा विचार सुरू झाला. त्यातून एक कल्पना पुढे आली - पन्नासावा अंक पूर्ण मुलांनीच तयार केला तर? ही कल्पना सर्व टीमनी उचलून धरली, आणि त्यातून आजचा हा '**मुलांनी केलेला, मुलांचा अंक**' जन्माला आला. आजच्या अंकातील सर्व, म्हणजे - विषय, संकल्पना, गोष्टींची निवड, लेखन, संपादन, डिझाईन - मुलांनीच केले आहे! नेहमीपेक्षा थोडा वेगळा असा आजचा हा प्रयोग तुम्हाला आवडेल अशी आशा आहे.

पुस्तक खिडकीच्या माध्यमातून आपण गेले पन्नास अंक एकमेकांच्या संपर्कात आहोत. तुम्ही या खिडकीतून अनेक गोष्टी ऐकल्या, वाचल्या. तुमच्या कलाकृती, लेखन तुम्ही आम्हाला पाठवलं, खूप प्रोत्साहन आणि प्रेम दिलं! आपला हा साहित्य-संवाद असाच पुढील अनेक अंकांमधून चालू राहो अशी आमची मनापासून इच्छा आहे आणि म्हणूनच आजच्या अंकाचा विषय आहे '**संवाद**'!

आजच्या अंकाचे अतिथी संपादक आहेत पुणे येथील 'प्रक्रिया को-लर्निंग स्पेस'ची मुले! अंकातील अनेक गोष्टी या मुलांनी लिहिल्या आहेत. त्यातील कृती, चित्रे स्वतः तयार केली आहेत. आलेले लेख आणि चित्रे यांची निवड, इतकेच नव्हे तर संपूर्ण अंकाची मांडणी सुद्धा मुलांनीच केली आहे. 'प्रक्रिया को-लर्निंग स्पेस' च्या मुलांचे आणि ताई-दादांचे इतका सुंदर अंक तयार केल्याबद्दल आभार, आणि अभिनंदन!

**अंकाचे अतिथी संपादक**


वेद


सृजन


शार्दूल


अवनींद्र


विहान


मल्हार


अन्वय

**अंकातील लेखन - वेद, सृजन, शार्दूल, अन्वय, मल्हार, अवनींद्र, अश्विनीताई, मुग्धताई, सचिनदादा**
**चित्रे, संकल्पना व मांडणी - विहान, मल्हार**

# 'प्रक्रिया को-लर्निंग स्पेस' बद्दल

पुणे येथील 'प्रक्रिया को-लर्निंग स्पेस' ही एक अशी जागा आहे जिथे मुलं काय शिकायचं, का शिकायचं आणि कसं हे समजून उमजून रोज नवीन गोष्टी शिकतात, अभ्यास करतात. इतकंच नाही तर स्वतःच्या शिकण्याच्या पद्धतीचा वेगवेगळ्या उपक्रमातून नव्याने शोध घेत असतात. मुले या जागेत सोमवार ते शुक्रवार रोज 9 ते 3 या वेळेत येऊन शिकण्याच्या आनंददायी प्रक्रियेचा अनुभव घेतात. पाठ्यपुस्तकासोबत अनेक विषयांचा सखोल अभ्यास कसा करावा यासाठी तज्ज्ञ व्यक्ती मार्गदर्शन करायला येतात.

संपर्क - मुग्धा नलावडे - 9765405541

# आजच्या अंकात




## झाडांनी केला उपाय

सृजन नलावडे

निसर्गातील हिरवीगार झाडं माणूस तोडू लागला की झाडांना नक्कीच वाईट वाटत असेल ना? आपल्यावर कुऱ्हाडीचे घाव पडत असताना झाडं एकमेकांशी काय बरं बोलत असतील?

## शाळा बोलली

वेद पत्की

दिवाळीच्या सुट्टीत शाळेची आठवण आली का? एका मित्राला शाळेची इतकी इतकी आठवण आली की तो शाळेशी बोलू लागला!

## छत्री आणि रेनकोट

अश्विनी पांडे

नवी खेळणी घरात आली की जुन्याबद्दल आपण सहज विसरुन जातो. त्या जुन्या खेळण्याला आपली आठवण येत असेल का? आपल्याला ते काही सांगू पाहत असेल का?

## मूक गीत

साइकिल द्वैमासिकातून साभार

काहीही न बोलतासुद्धा संवाद साधता येतो. कधी हा मूक संवाद समोरच्यापर्यंत पोचतो, पण क्वचित तो आपल्याच मनात राहून जातो.

## पुस्तक परिचय - इरा विराज आणि टाईम मशिन

मल्हार बापट

टाईम मशिन मध्ये बसून इतिहासात फिरायला जायला मिळालेले कोणाला नाही आवडणार? इरा आणि विराज या दोन मित्रांना टाईम मशिन मिळाल्यावर काय काय मजा होते हे सांगणाऱ्या या इतिहासाच्या पुस्तकाचा परिचय पाहू.

## टाईम मशिन मधून हनुमानाची भेट

शार्दूल बेहेरे

टाईम मशिन मध्ये बसून आमचा एक मित्र थेट रामायणाच्या काळात गेला आहे. तिथे त्याचा चक्क हनुमनशी संवाद सुरु आहे!

## गॅजेट्सशी बोलू या

अन्वय लोणकर

आपल्या घरातील टीव्ही, रिमोट, इतर यंत्र एकमेकांशी काय संवाद करत असतील? काही कृतींमधून असा वेगळा विचार करून पाहू.

## वाचकांकडून

पुस्तक खिडकीच्या बाल-वाचकांनी पाठवलेल्या काही निवडक कविता, लेखन, चित्रे




# मोठ्यांसाठी


## पुस्तक परिचय - अवघा देहचि वृक्ष जाहला

मुग्धा नलावडे

## पालकांसाठी छोटासा खेळ

मुग्धा नलावडे

## प्रारंभ - दोन नात्यांच्या प्रवासाचा

सचिन नलावडे

# झाडांनी केला उपाय

सृजन नलावडे

चित्र: विहान साळस्कर

एके दिवशी माणसांनी ठरवलं की एका जंगलात आपण बिल्डिंग बांधू या. या जंगलात लिंबू (लिंबाचे झाड), पिंपू (पिंपळाचे झाड) आणि वडू (वडाचे झाड) हे तिघेही राहत होते. दुसऱ्या दिवशी सकाळी माणसे आली आणि पिंपूला कापून घेऊन गेली. हे त्याच्या मित्रांनी, वडू आणि लिंबूने पाहिले. त्यांना धक्का बसला. आपला मित्र आपल्याला सोडून गेल्याबद्दल त्यांना खूप वाईट वाटले. आता अशी सगळी झाडे तोडली तर काय होईल? यावर काहीतरी उपाय करायला हवा. ते विचार करू लागले.

वडू म्हणाला, "ज्यांच्या डोक्यावर फळे येतात, त्यांना आपण सांगू की या वर्षी दुप्पट संख्येने फळे तयार करा. म्हणजे यावर्षी नेहेमीपेक्षा दुप्पट बिया तयार होतील."

"अगदी बरोबर. मी माझ्या पक्षी-मित्रांना सांगतो की यावर्षी खूप खूप फळे खा आणि जिथे जागा दिसेल तिथे बियांचा प्रसार करा. त्यामुळे आपले जंगल अजून दाट होईल." लिंबू म्हणाला.

सर्व जंगलात ठरलेला संदेश पाठवला गेला. पक्षी आणि इतर झाडे यांच्या मदतीने जंगल अधिक दाट आणि मोठे बनवण्यासाठी सर्वांनी एकत्र प्रयत्न केले. झाडे इतकी दाट आणि मोठी झाली की काही वर्षांतच जंगलातून चालणेही अवघड होऊन बसले. झाडे तोडणे तर दूरचीच गोष्ट, माणसांना तिकडे जाणेसुद्धा मुश्किल झाले. शेवटी, तिकडे इमारती बांधायच्या नाहीत असे माणसांनी ठरवले आणि ते पुन्हा जंगलात कधीच आले नाहीत.



चित्र: स्वरा विपुल सुतार, ९ वर्ष, बदलापूर

# शाळा बोलली

वेद पत्की



शिव कोरोना नंतर दोन वर्षांनी शाळेत गेला. शाळा बघून त्याला खूप आनंद झाला. तेवढ्यात त्याला आवाज आला.

"शिव, तू किती दिवसांनी आलास माझ्याकडे!!"

**शिव:** अरे! कोण बोलताय?

**शाळा:** अरे मी बोलत्ये शिव, तुझी शाळा!

**शिव:** तू बोलू शकतेस?

**शाळा:** हो तर! मी बोलू शकते. तू कसा आहेस शिव?

**शिव:** मी एकदम छान. आणि तू?

**शाळा:** तुम्ही इतके दिवस नव्हता, त्यामुळे कंटाळली आहे. तुम्ही आलात, आता मला छान वाटत आहे.

**शिव:** मलाही ऑनलाइन शाळा करून खूप बोर झालं होतं. मित्र भेटत नव्हते.

**शाळा:** हो न, मी पण एकटीच होते.

**शिव:** मी घरात बसून, टीव्ही बघून बोर झालेलो.

**शाळा:** मला वाटत होतं आज नाही तर उद्या याल, पण तुम्ही किती दिवस आलाच नाहीत!



**शिव:** कसं येणार? त्या कोरोनानी आम्हाला बाहेर पडू दिलं नाही ना.

**शाळा:** कोरोना? हे कोण आहे?

**शिव:** तुला कोरोना माहित नाही? तो ना एक जंतू आहे. त्याच्यामुळे आपल्याला ताप, खोकला, सर्दी होते.

**शाळा:** हो?

**शिव:** हो!!

**शाळा:** मग तुम्ही त्याला डेटॉलनी मारत का नाही?

**शिव:** कारण तो आम्हाला दिसतंच नाही.

**शाळा:** ठीक आहे. पण तुम्ही सगळे ठीक आहेत हे बघून बरं वाटलं. मी तुमचे खेळ, दंगा, मस्ती, अभ्यास सगळं खूप मिस केलं.

**शिव:** आम्ही पण तुला खूप मिस केलं गं!

(तेवढ्यात शिवची ताई येते.)

**ताई:** शिव, अरे कुठे राहिलास? चल ये इकडे.

**शिव:** आलो, आलो. चल, मी जातो गं आता. मला ताई बोलावते आहे. आता रोज बोलू! बाय!

---

**ऐकू या**

# छत्री आणि रेनकोट

लेखन - अश्विनी पांडे, कथन - अवनींद्र पित्रे



घरात नव्याने आलेल्या रेनकोटशी, त्या घरात अनेक वर्ष राहिलेली, अनेक पावसाळे पाहिलेली छत्री काय बरं बोलेल?

जाणून घेण्यासाठी चित्रावर क्लिक करा आणि ही गोष्ट ऐका!

# मूक गीत

शेल सिल्वरस्टीन
चित्रः प्रोइती रॉय

गीत ऐकू शकत नव्हता.

एके दिवशी त्याची गाठ पडली बडबड्या बिट्टीशी.

आणि तो  बस्स इतकंच म्हणू शकला

'तू मला खूप आवडतोस गीत' बिट्टी म्हणून मोकळी झाली.



"तुला मी आवडते का गीत? "बिट्टीने विचारलं.

पण गीत  इतकंच म्हणू शकला

बिट्टी "बाय गीत. बाय बाय" म्हणत त्याचा निरोप घेत निघून गेली.

आणि गीत  तेच, फक्त तेच, तेवढंच म्हणत राहिला



बिट्टी निघून गेली. तिला हे कळलंच नाही

की  याचा अर्थ होतो

माझं तुझ्यावर खूप प्रेम आहे.



साइकिल द्वैमासिक ऑगस्ट सप्टेंबर २०१८ मधून साभार
मराठी अनुवाद - वंदना कुलकर्णी




इतिहासाशी संवाद

# इरा, विराज आणि टाईम मशिन

मल्हार बापट

इरा विराज आणि टाईम मशिन हे पुस्तक आम्ही आमच्या शाळेत मिळून वाचले. या पुस्तकातली तीन पात्रे म्हणजे इरा, विराज आणि संजय दादा. विराज माझा लाडका आहे कारण त्याला टेकनॉलॉजीचे खूप ज्ञान असते आणि मला पण टेकनॉलॉजी खूप आवडते. इराला पुस्तके वाचायला आवडत असतात आणि संजय दादाचे गॅरेज असते. इरा आणि विराजला जुन्यापुराण्या वस्तू खूप आवडत असतात, आणि पुण्यात जुन्या गोष्टी मिळण्याचे ठिकाण म्हणजे जुना बाजार! ते त्यांचे फिरायला जाण्याचे आवडते ठिकाण असते. एकदा हे दोघे असेच जुन्या बाजारात फिरायला जातात आणि तिथे त्यांना चक्क एक टाईम मशिन सापडते! आपल्याकडचा सगळा पॉकेट मनी एकत्र करून हे दोघे ते टाईम मशिन विकत घेतात. टाईम मशिनवरचा खटका दाबून ते थेट १५ नोव्हेंबर १७५० सालात जातात! त्या वेळचा शनिवार वाडा, नागझरी ओढा, आंबिल ओढा, कात्रज तलाव, सारस बाग हे सगळे बघता बघता पुण्याच्या भूतकाळात हरवून जातात. भूकाळातली रहस्ये उलगडताना नवी कोणती संकटे येतात? हे जाणून घेण्यासाठी 'इरा, विराज आणि टाईम मशिन' हे पुस्तक तुम्हाला वाचायलाच हवे! हे पुस्तक ऍमेझॉन वरून घेता येते, आणि अदिती देवधर यांनी लिहिले आहे.

# टाईम मशिन मधून हनुमानाची भेट

शार्दूल बेहेरे

**मी:** नमस्कार हनुमान!

**हनुमान:** तू रे कोण? खूप वेगळाच दिसतोस. तुझे नाव काय?

**मी:** माझे नाव शार्दूल आहे. मी तुमच्या खूप पुढच्या काळातून आलो आहे. रामाने रावणाला कसे मारले हे मला सांगाल?

**हनुमान:** सांगतो! राम आणि रावणाचे खूप वेळ युद्ध चालू होते. मग विभीषणाने रामाला सांगितले की रावणाच्या बेंबीत अमृत आहे. अग्निअस्त्र वापरून ते अमृत कोरडे करा, नंतर बाणाने त्याला मारा. रामाने तेच केले आणि रावणाला मारले.



**मी:** असे होय! अजून एक प्रश्न विचारू का?

**हनुमान:** विचार, पण एकच! माझी व्यायामाची वेळ झाली आहे.

**मी:** हनुमान... आता शहरं झाली आहेत...

**हनुमान:** होय, मग?

**मी:** म्हणजे..तुम्हाला उडायला त्रास होत असेल ना? आधी कसं सगळं मोकळं मोकळं असेल. आता जर तुम्ही उडत असताना समोर बुर्ज खलिफा सारखा एखादा मोठ्ठा टॉवर आला तर काय होते?

**हनुमान:** अरे तसे पूर्वीपण मोठे पर्वत असायचेच वाटेत. पण हे तुमचे टॉवर मात्र मला उचलून टाकून द्यावेसे वाटतात. सारखे मध्ये मध्ये येतात.

**मी:** तुला त्रास होतो याबद्दल मी सर्व माणसांकडून तुझी माफी मागतो. तुझा जास्त वेळ घेत नाही, आता मी परत माझ्या घरी जातो! धन्यवाद हनुमाना! नमस्कार!!




करू या

तुमच्या घरी कधी असं झालंय का, की सर्व गॅजेट्स एकमेकांशी, तुमच्याशी बोलू लागली आहेत? खाली तीन कृती दिल्या आहेत. त्यातून आपण वापरत असलेल्या गॅजेट्स बरोबर थोडा संवाद करू या!

अन्वय लोणकर

1

## टीव्ही मोबाईल संवाद

आपण झोपतो तेव्हा टीव्ही मोबाईल बंद करतो. मात्र ते तसेच शांत बसत असतील का एकमेकांशी काही बोलत असतील? काय बरं बोलतील? दिवसभर माणसांनी आपल्याला किती वापरलं, आपल्यामुळे कोणाकोणाशी बोलू शकले, माहिती मिळवू शकले असं बोलत असतील का? का "आपल्यामुळे माणसं एकमेकांशी बोलायची कशी बंद झाली आहेत" हे बोलत असतील?

आता तुम्ही विचार करा, आणि टीव्ही आणि मोबाईल यांचा एक संवाद लिहा!

2

## गॅजेट्सचे भांडण

एकदा काय झाले, टीव्ही, मोबाईल, टॅब, लॅपटॉप, कम्प्युटर यांच्यामध्ये खूप मोठे भांडण झाले. आपल्यात श्रेष्ठ कोण यावरून खूप वाद झाला. तुम्हाला काय वाटतं, भांडणात काय काय मुद्दे निघाले असतील? शेवटी कोण जिंकले असेल?

तुमच्या मित्रांना घेऊन यावर एक नाटक लिहा आणि ते बसवा. आई बाबा, शेजारी-पाजारी यांच्यासमोर त्याचे सादरीकरण करा!

3

## गॅजेट्स शिवाय एक रविवार

तुम्ही रोज मोबाईल, टीव्ही, लॅपटॉप, टॅब काहीतरी बघत असाल. घरातले मोठे सुद्धा कोणतेतरी गॅजेट बघत असतीलच. एक रविवार असा ठरवा, की त्या दिवशी घरातल्या सर्वांनी सर्व गॅजेट्स बंद ठेवा, लपवूनच ठेवा! आणि हा रविवार "Sunday without media day", म्हणजेच गॅजेट्स शिवाय रविवार म्हणून साजरा करा. या दिवशी तुम्ही काय काय केले, एकमेकांबरोबर जास्त बोललात का? खेळलात का? हे आम्हाला कळवा!



# वाचकांकडून

**आम्ही केलेल्या आवाहनाला पुस्तक खिडकीच्या बाल-वाचकांकडून भरघोस प्रतिसाद आला, आणि अतिशय सुरेख लेखन, कलाकृती आमच्यापर्यंत पोचल्या. सर्वच साहित्य सुंदर होते, मात्र जागेच्या अभावामुळे त्यातील काही निवडक इथे देत आहोत.**

## खाल्ला मार

कुबेर बढे, 10 वर्ष, पुणे






















---

### त्रास

काय त्रास....काय त्रास,
दीडतासभर त्रासच त्रास!

कधी कधी आई ओरडते,
कधी बाबा... आज्जी चिडवते,
कधी कधी कुत्रे भुंकते,
अभ्यासाची काळजी लागते!
काय त्रास....काय त्रास...
दीड तासभर त्रासच त्रास!

काय करू मी काय करू
मैत्रिणीशी भांडण, कुणा कुणाला मारू?
काय त्रास....काय त्रास...
दीड तासभर त्रासच त्रास!

त्रास त्रास सारखा त्रास,
आई, बाबा, मैत्रीण, कुत्रा
विविध प्रकारे त्रासच त्रास!
काय त्रास....काय त्रास....
दीड तासभर त्रासच त्रास!!!!

- साईरा औरंगाबादकर



### माझी शाळा

आनंद निकेतन माझी शाळा ,
तिने मला लावला लळा . . .
अभ्यास असतो खुपच सोपा,
ताईंशी मारतो भरपूर गप्पा . . .
अभ्यास होतो पटकन,
खेळाचा तास येतो झटकन . . .
रात्रनिवासाची वाट पाहतो ,
मी शाळेत झोपायला जातो . . .
असे वाटते शाळेत जावे,
सगळ्या ताईंना भेटून यावे . . .
देवबाप्पाला मी सांगतो रोज,
हा कोरोना लवकर संपूदे,
आता मला शाळेत जाऊदे . . .

- चित्र व कविता: नृपाल सूर्यवंशी, नाशिक

### If I could fly

If I could fly
I'll soar high in the sky

If I could fly
I'll sleep on the cloud's soft bed
with my teddy bear Ted

If I could fly
I'll fly with every single bird in the air
Things will look small from there

If I could fly
I'll do many stunts wihtout fear
Hey! It's safe up here

If I could fly
I'll have so much fun
But when my mom calls me
I'll say bye bye!!

-देवयानी, १० वर्ष, पुणे

# वाचकांकडून

**नाशिक येथील आनंद निकेतन शाळेतील मुलांनी चित्रावरून काही कविता लिहिल्या आहेत. हे मांजरींचे चित्र पाहून तुम्हाला काही कविता, किंवा लेखन सुचते आहे का?**

तीन मांजरी, त्यांच्यात आहे चांगली मैत्री
धावत जाऊनी, उड्या मारुनी बसती भिंतीवरी
तीन मांजरी, गळ्यात हात घालून
निसर्गसौंदर्य बघती
अफाट असे समुद्र त्यात खूप मासे पोहती
ते पाहून तीन मांजरी त्यांचे भोजन करती
म्हणूनच त्यांच्यात आहे चांगली मैत्री
जगात फिरती, विसरुनी जाती
मनातली भीती
जगात त्यांच्या मनाने फिरती
गप्पा दंगा करती
सर्वांच्या मनात सुंदर
स्वप्नांची गती
म्हणूनच त्यांच्यात आहे चांगली मैत्री!

- वेदांत, सातवी

तीन होत्या मैत्रिणी
होत्या त्या गृहिणी
ठरवले होते फिरायचे
कुणी काय काय करायचे
पांढरुने आणली शिदोरी
काळूने आणली कचोरी
सगळ्यांनी खाल्ली पाणीपुरी
केली मज्जाच भारी
फिरुन खूप दमल्या
घरात जाऊन झोपल्या
दुसऱ्या दिवशी होती भिशी
तयार केली त्यांनी कपबशी
कपबशी करून दमल्या
घरी जाऊन झोपल्या!

- ओवी चौगुले, पाचवी

होत्या तीन मांजरी
चांगल्या होत्या मैत्रिणी
तिघींनी केली एक युक्ती
जाऊ आपण शेजारच्या घरी
दूध करू चोरी
गेल्या तिघी जणी तिथे
आला तेवढ्यात मालक तिथे
मालकाने उचलली काठी
तिघी पळाल्या घरी.

- सई ठाकरे, पाचवी



---



रेवती जपे
१० वर्ष



प्रत्युषा जोशी
९ वर्ष, बदलापूर



साक्षी शिरोडे, वय ११, पुणे



चित्र व गोष्ट - ग्रिशा देवस्थळे, ५ वर्ष

माझं नाव आहे चिंटी. मी आहे एक अळी. मला फिरायला खूप खूप खूप आवडतं. मी रोज रात्री, रोज दुपारी झोपते. पण मला बाहेर अंगणात जायची फार भिती वाटते. मी अजून जंगलात फिरू शकते. पण मला बाहेर वनापेक्षा कुठेतरी जिन्यावर वगैरे जायला भिती वाटते. म्हणून माझी आई सांगते की बाळा तू आता माझ्याबरोबर घराच्या जिन्यावर चल. मग मी म्हणते, "आई आई नको नको मला भिती वाटते". आई म्हणते, "अगं बाळा मी आहे ना बरोबर, घाबरू नकोस". मग मी जाते.

# पुस्तक परिचय - अवघा देहचि वृक्ष जाहला

**लेखिका - वीणा गवाणकर** **राजहंस प्रकाशन**




पुस्तक हातात आले तेव्हा त्याचे नाव वाचून गंमत वाटली. अवघा रंग एक झाला हा अभंग ओठांवर येतो, पण 'अवघा देह वृक्ष जाहला'? म्हणजे काय असेल? पुस्तक वाचायला घेतले आणि एक एक पान वाचत पुढे जाताना या पुस्तकातील व्यक्तिमत्व उलगडत गेले, रिचर्ड बेकर हे नाव, त्यांच्या जन्मापासूनच त्यांच्यात रुजलेले वनस्पतीप्रेम जाणवायला लागले. या व्यक्तिमत्वाने वृक्ष संवर्धनासाठी काय काय काम केले असेल, त्यांना कोणती आव्हाने पार करावी लागली असतील? हे सर्व दिसू लागले. ज्या काळात समाजाच्या मनाला 'पर्यावरण संवर्धन' या विषयीचा विचारही शिवला नव्हता, त्या काळातील ही गोष्ट. आज जगभर चालू असलेल्या पर्यावरण चळवळीचा प्रणेता रिचर्ड बेकर आहे असे म्हणणे चुकीचे ठरणार नाही. पर्यावरणाचा इतका ध्यास या व्यक्तीने घेतला होता. पृथ्वी वाचवायची असेल तर अविरतपणे झाडे लावणे अनिवार्य आहे हे सर्वांपर्यंत पोचवण्याची त्यांची तळमळ आपल्याला निसर्गाचे भान आणल्याशिवाय राहत नाही. भारतातली पहिली पर्यावरण चळवळ म्हणून ज्याकडे आपण बघतो ते 'चिपको आंदोलन' हे रिचर्ड बेकर यांच्या विचारांनी प्रेरित झालेल्या सुंदरलाल बहुगुणा यांनी सुरू केले होते. जंगलाचा मित्र असणाऱ्या आदिवासी लोकांना हाताशी धरून, त्यांची भाषा आत्मसात करून, त्यांना वृक्षलागवडीचे महत्त्व सांगून त्यांनी ही चळवळ जिवंत ठेवण्याचे काम चालू ठेवले. जगातील सर्व देशांनी रिचर्ड बेकर यांचे म्हणणे ऐकले असते तर कदाचित आज बोलल्या जाणाऱ्या 'ग्लोबल वार्मिंग' याविषयावर आपल्याला काम करावे लागले नसते असे हे पुस्तक वाचल्यावर मनोमन वाटते. रिचर्ड बेकर यांनी स्वतःचे संपूर्ण आयुष्य केवळ निसर्गातील प्रत्येक घटक कसा परस्परपूरक आहे व परस्परावलंबी आहे हे समाजाला समजावून सांगण्यासाठी वेचले. वृक्ष संवर्धन हे त्यांचे जीवितकार्य बनले खरे पण त्या सोबत त्यांना घोड्यांचे अगाध ज्ञान होते, त्यांचा धर्मशास्त्राचा ही अभ्यास होता. मात्र वृक्ष संवर्धन करणे, वृक्षतोड थांबवणे, वृक्षांची लागवड करत राहणे, या कामात त्यांनी स्वतः ला वाहून घेतले. हे काम करताना अनंत अडचणींना त्यांना समोरे जावे लागले पण त्यांनी घेतला वसा सोडला नाही. रिचर्ड बेकर हे व्यक्तिमत्व घडले नसते तर आज पर्यावरणाची अवस्था काय असती हा विचारही करवत नाही. रिचर्ड बेकर यांच्या पुस्तकातून, यांच्या भाषणातून अनेकांनी प्रेरणा घेऊन वनस्पती शास्त्राचे काम पुढे वाढवत नेले, याच क्षेत्रात अनेकांना आपले जीवितकार्य गवसले. जसा वृक्षाचा प्रत्येक घटक म्हणजे पान, फुल, फळ, खोड, मूळ उपयुक्त असतो तसेच रिचर्ड बेकर यांचे काम, त्यांची पुस्तके, संशोधन, भाषणे, मुलाखती, आणि प्रत्यक्ष भेटीतून अनेकांच्या जीवनाला दिशा मिळाली. म्हणूनच या पुस्तकाचे नाव 'अवघा देह वृक्ष जाहला' असे दिले असावे!

- मुग्धा नलावडे





चित्र: विहान साळस्कर

# पालकांसाठी एक छोटासा खेळ ...

संकल्पना - मुग्धा नलावडे

आपण आपल्या मुलांबरोबर खरा संवाद किती करतो, आणि उपदेश, प्रश्न, सूचना, तुलना, उपहास असलेले किती बोलतो यावर थोडा विचार करू या. खाली काही वाक्ये दिली आहेत, त्यातील कोणती वाक्ये कोणत्या ढगात जाऊ शकतात असा विचार करा आणि ती तिथे टाका.

तुझी खेळणी तू त्याच्याशी share करायला हवी.

अरे असे भांडू नये.

सूचना

अरे खिडकीतून उड्या मारू नको

तुलना

उपदेश

त्या शेजारचा अनय किती अभ्यास करतो माहिती आहे का? नाही तर तू

आहाहा!! आले आमचे महेंद्रसिंग धोनी.... काय ते क्रिकेटचे वेड .... काय होणार कोणास ठाऊक

टीव्ही बघू नये रे जास्त, वेळ वाया घालवू नये असा, एक एक क्षण महत्त्वाचा असतो आयुष्यात, ध्येय असावे माणसाला, काही तरी.

तुला जर यावर्षी चांगले मार्क्स पडले तर आपण तुला सायकल घेऊ यात.

माहिती काढणारे प्रश्न

लाज आणतो हा मुलगा!! अरे ! धड वाचायला येत नाही तुला, अभ्यासाच्या नावाने नुसता शंख, तोंड बघ आरशात...

शाळेत काय काय झालं आज? होम वर्क झाला का?

उपहास

काय चाललंय काय तुझं? आम्ही बोलतोय काय? तू वागतोय काय? अरे तुझ्याशी बोलतोय ना मी?

संवाद म्हणजे तुलना, उपहास, उपदेश, माहिती विचारणे, सूचना करणे नाही! मग काय असतो संवाद? या मोकळ्या ढगात मुलांशी 'संवाद' करायचा म्हणजे तुम्हाला काय असेल असे वाटते ते लिहा.

'मुलांशी संवाद' म्हणजे नक्की काय बरं?

मोठ्यांचे पान



# प्रारंभ: दोन नात्यांच्या प्रवासाचा

**आई/बाबा :**

आमची प्रत्येक कृती ही तुझा विकास व्हावा, तुझे आयुष्य सुखकर व्हावे, तुझे भले व्हावे याच उद्देशाने केलेली असते. तुला कसलीच कमी भासू नये याची आम्ही पूर्ण काळजी घेतोय. अगदी तुझ्या जन्मापासून आम्ही केवळ तुझ्या आणि तुझ्या भविष्यासाठीच कष्ट करतोय. तुझा जन्म झाला आणि तुझ्या विचारांनी आम्हाला व्यापून टाकलं. तुझं भविष्य कसं असावं, तुझं शिक्षण, करियर कसं असावं, हे विचार सतत मनात घोळत असतात. आम्हाला जे कष्ट पडले ते भविष्यात तुला पडू नये म्हणून सतत आमची धडपड चालू असते. तुझी काळजी वाटत असते आणि मग विचारांची शृंखला सुरू होते. अस्वस्थता वाढत जाते. त्यामुळे तू एखादी छोटी चूक केलीस तरी आमचा स्फोट होतो. नंतर येते रे बाळा लक्षात, की आम्ही चुकीच्या पद्धतीने प्रश्न हाताळला ते. पण आमचा उद्देश चांगलाच आहे. तुझं भविष्य घडवण्यासाठी ही धडपड चालू आहे.

खरं तर आयुष्यात बरंच काही मिळालं आहे, आणखीन काही मिळवायचे प्रयत्न चालू आहेत, पण मनापासून सांगू का? एक अनामिक रितेपण जाणवतंय. काहीतरी सुटत चाललंय असं वाटतंय रे! मनात पोकळी निर्माण झाली आहे. बाळा, जसजसा काळ जातो आहे तसतसा तू अमच्यपासून दूर जातो आहेस असं वाटतंय. तुझ्या आयुष्याची जबाबदारी घेता घेता त्याचा हा एवढा गुंता आम्ही कधी करून ठेवला? आणि आता तो गुंता सोडवताना स्वतःच त्या गुंत्यात अडकतो आहे, तुझ्यापासून दूर जातो आहे असं वाटतंय. तू समाधानी आहेस असं वर वर वाटतं, पण आतून हा दुरावा वाढत चाललाय ही भीती जात नाही.



**मूल :**

माझीही प्रत्येक कृती तुम्हाला आनंद मिळावा याचसाठी असते. मला माहित्ये, तुम्ही सर्व काही माझ्यासाठीच करत आहात पण एक गोष्ट सतत सलत असते. तुम्हाला माझ्यापेक्षा माझं भविष्य जास्त प्रिय आहे. खरं सांगू का, माझं भविष्य ही एक कल्पना आहे आणि वर्तमानातील 'मी' हे सत्य आहे. हे सत्य तुम्ही नाकारत आहात. मी तुम्हाला वर्तमानात, या क्षणात शोधत आहे आणि तुम्ही तुम्हाला अपेक्षित असलेल्या कल्पनेत - माझ्या भविष्यात - मला शोधत आहात.

सतत मला सूचना देत असता, शिकवत असता, माझ्या गरजा तुम्हीच ठरवत असता. वस्तू, अपेक्षा, विचार - काहीतरी सतत देत असता, पण तुमच्या या सतत 'देण्या'मुळे माझ्यातला 'मी' गुदमरतो...आणि तुमच्यातले तुम्ही पण. तुम्ही खूप देताय असं तुम्हाला वाटतं, पण हे तुमचं देत राहणं थांबवल्याशिवाय, 'माझ्यातले स्व' बाहेर येणार नाही. तुम्ही तुमचे विचार देणे जोपर्यंत थांबवत नाही तोपर्यंत माझे स्वतःचे विचार कसे तयार होतील? तुम्ही माझ्यासाठी निर्णय घेणं जोपर्यंत थांबवत नाही, तोपर्यंत मला माझे निर्णय कसे घेता येतील? त्यांची जबाबदारी कशी घेता येईल?

तुमच्या विचारात, चिंतेत, काळजीत, सामाजिक प्रतिष्ठेच्या ओझ्यात मी दबून जातोय. मला या सगळ्यातून मुक्त व्हायचे आहे, त्याशिवाय मला 'मी' कधीच सापडणार नाही. मी स्वतंत्र होणार नाही.

मला माझ्या अस्तित्वाचा शोध घेऊ द्या. माझा प्रवास मला माझ्या विचारातून आणि अभ्यासातून करू द्या. तुम्ही फक्त इंधन भरायचं काम करा. रस्त्यावर असलेल्या खड्डयातून माझा मला मार्ग काढू द्या. प्रवासाची दिशा मला ठरवू द्या. एखाद्या ठिकाणी पोचल्यावर मला तिथेच पोचायचे होते का इतर कुठे जायचे हे माझे मला कळेल.

माझा प्रवास कधी सुखकर होईल तुम्हाला माहितीय का?

जेव्हा तुम्ही तुमच्या 'स्व' शोधण्याच्या प्रवासाला सुरुवात कराल, तेव्हा.

मला तुम्ही हवे आहात, दंगा मस्ती करताना, भविष्याचे ओझे न घेता प्रत्येक क्षण उत्साहात जगताना. स्वतःच्या अवडींना प्राधान्य आणि वेळ देताना. दुरावा आपल्यात नाही, दुरावा तुमचा तुमच्या स्वतःपासून निर्माण झाला आहे. आणि म्हणून तुम्हाला कितीही मिळवले तरी रितेपण वाटते आहे. पण खरं सांगू? मी आहे तुमच्यासोबत आणि तुम्ही आहात माझ्यासोबत, आणि इतकं पुरेसं आहे! तुम्ही माझा विचार न करता तुमच्या स्वतः च्या शोधाचा प्रवास सुरु करा व मी माझा करतो.



चला आपण आपापला हा प्रवास सुरु करू या!

सचिन नलावडे
संचालक
Prakriya Co- learning Space (Experiential & Organic Learning Project )